2

201408251507273723

**ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले, नायगाव, ता. खंडाळा, जिल्हा सातारा येथे शिल्पसृष्टी उभारण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत व निधी वितरीत करण्याबाबत.**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग/पर्यटन
शासन निर्णय क्र. टीडीएस २००८/११/प्र.क्र. २८२/पर्यटन
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑगस्ट २००९

**वाचा :-** १) म.प.वि.म. पत्र क्र. मपविम/विकास/प्रस्ताव/सा.फुले/२००८ दिनांक - १८ ऑगष्ट २००८.
२) शासन निर्णय क्र. टीडीएस २००८/११/प्र.क्र. २८२/पर्यटन दि. ३ नोव्हेंबर, २००८.
३) शासन निर्णय, क्रमांक टीडीएस २००९/७/प्र.क्र.१५५ पर्यटन, १३ ऑगष्ट २००९.

**शासन निर्णय :-** संदर्भाधीन अनु.क्र. २ येथील ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले, नायगाव, ता. खंडाळा, जिल्हा सातारा येथे त्यांच्या स्मृति प्रित्यार्थ शिल्पसृष्टी उभारण्याच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भाधीन अनु.क्र. १ येथील पत्रान्वये व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई याच कडून नायगाव, ता. खंडाळा, जिल्हा सातारा येथे ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले स्मृति शिल्प उभारण्याचा रुपये ९२.२५ लाख एवढया रक्कमेचा आराखडा, अंदाजपत्रक व नकाशा सादर केलेला आहे.

संदर्भाधीन अनु.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सदर अंदाजपत्रकातील खालील कामांना प्रशासकीय मान्यता देण्यास व रु. ९२.२५ लाख एवढया रकमे पैकी ५० टक्के रक्कम रु. ४६.१३ लाख इतका निधी वितरीत करण्यास शासनाने मंजूरी दिली आहे. आता या शासन निर्णयान्वये उर्वरित ५० टक्के रक्कम रु. ४६.१२ लाख इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम | प्रशासकीय मान्यतेची रक्कम | वितरीत केलेली रक्कम | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | व्हरांड्याचे बांधकाम (फरशी, प्लास्टर, भिंती, छप्पर,पॉलिश इ.) | ११.३९ | ११.३९ | ४६.१३ | ४६.१२ |
| २ | हॉल आणि शौचालयाचे बांधकाम (प्लास्टर, छप्पर, खिडक्या-दारे, पॉलिश इ.) | १७.१२ | १७.१२ | | |
| ३ | शिल्पकृती | २८.८७ | २८.८७ | | |
| ४ | शिल्पकृतीबाबतची माहिती फलके | ३.२० | ३.२० | | |
| ५ | ओपन कोर्ट यार्ड | ३.६९ | ३.६९ | | |
| ६ | जमिन विकास, रोपे लावणे व फरशी बसविणे | २.०० | २.०० | | |
| ७ | विद्युतीकरण | ९.९४ | ९.९४ | | |
| ८ | पाणी पुरवठा व मलनिसरण | ६.६२ | ६.६२ | | |
| ११ | आकस्तिक खर्च | ४.१४ | ४.१४ | | |
| १२ | आस्थापना खर्च | १.७४ | १.७४ | | |
| १३ | वास्तुविशारद फी | ३.५४ | ३.५४ | | |
| | **एकूण** | **९२.२५** | **९२.२५** | **४६.१३** | **४६.१२** |

D:\Meher २००९\G.R\Savitri Fule- Shilpashrusthi.doc

संदर्भाधीन अनु.क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत सन २००९-१० मध्ये वितरीत केलेल्या रक्कमेतून **रु. १९०२.५० लाख** इतका निधीतून ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले, नायगाव, ता. खंडाळा, जिल्हा सातारा येथे शिल्पसृष्टी उभारण्याबाबतची उर्वरित कामे करण्यासाठी **रु.४६.१२ लाख** इतका निधी खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून कामे करावीत व त्याचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा. अटी व शर्ती खालील प्रमाणे आहेत.

१) वरील तक्त्यात दर्शविलेली उर्वरित कामे करण्यासाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास **रु.४६,१२,०००/- (रुपये सेहेचाळीस लाख बारा हजार फक्त)** मंजूर करण्यात येत आहेत.

२) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

३) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी म.प.वि.म. यांच्यावर राहील व जादा खर्चाप्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

४) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च निधी प्राप्त होताच करावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

५) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

६) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

७) उपरोक्त सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता, यापूर्वी घेतली नसल्यास, काम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करुन घेण्यात यावी. ज्या प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटीं व शर्तींची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

८) वर अनु.क्र. ७ येथे नमूद केल्याप्रमाणे म.प.वि.म. यांनी प्रत्येक कामाला प्रशासकीय मान्यता देऊन कामे मंजूर करावीत. तसेच त्यांनी कामांचा नियतकालीक (मासिक/त्रैमासिक) आढावा घेऊन नंतरच पुढील कामांना निधी वितरीत करावा.

९) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

१०) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने

करण्यासंदर्भात म.प.वि.म./जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणा-या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

११) सदर निधीतून होणा-या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

१२) सदर कामे पूर्ण झाल्यानंतर त्यांच्या देखभालीची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी कामे करणाऱ्या विभागांची राहील.

१३) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २००९-१०या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष "३४५२-पर्यटन मागणी क्र. झेड्डी-४-०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा १०१ - पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणी मूलभूत सुविधासाठी अनुदान (३४५२ १९५ ८) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) " या लेखा शिर्षाखालील मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

१४) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने यासंदर्भात होणाऱ्या खर्चाचा मेळ महालेखापालांच्या कार्यालयाशी घालून त्याबाबतचे विवरणपत्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील नियमांप्रमाणे शासनास सादर करावे.

१५) हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र१०.०८/प्र.क्र.७०/२००८, दि.१५ मे २००९ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(आ.बा.डमाळे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
विभागीय आयुक्त, पुणे
जिल्हाधिकारी, सातारा
जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (का.१४१२) मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-१४/अर्थोपाय)मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी, सां.का.-(अर्थसं), पर्यटन व सां.का.विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती, पर्यटन, पर्यटन व सां.का.विभाग, मंत्रालय, मुंबई.